**मुख्य वनसंरक्षक (कार्य आयोजना), पूर्व नागपूर यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : एफडीएम २०२१/प्र.क्र.८८/फ-२**
**हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,**
**दिनांक :- २१ जानेवारी, २०२२**

**संदर्भ :-** १) वित्त विभाग, शासन निर्णय, क्रमांक-मकोनि-१०००/प्र.क्र.४४/०५,कोषा-प्र.५ दि. ०४.०१.२००६.

२) प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास), नागपूर यांच्या कार्यालयाचे पत्र क्र.कक्ष-२(१)/असं/प्र.क्र.१७/२५२/२०२१-२२, दि.२४.१२.२०२१

**प्रस्तावना -**

शासनाच्या वन विभागाच्या क्षेत्रिय कार्यालयातील कर्मचाऱ्यांची वेतन व भत्यांची देयके फेब्रुवारी-२००६ पासून इतर विभागाच्या कर्मचाऱ्यांप्रमाणेच कोषागारातून पारित करण्याबाबत वित्त विभागाच्या संदर्भाधिन दि.०४.०१.२००६ च्या शासन निर्णयान्वये निर्णय घेण्यात आला आहे. यानुसार महाराष्ट्र कोषागार नियम १९६८ खंड-१ मधील नियम १३ नुसार व नियम १५(३) नुसार विभागातील आहरण व संवितरण अधिकाऱ्यांची यादी महालेखापाल कार्यालयाकडे पाठविण्यात येते. यानुसार वेळोवेळी निर्गमीत केलेल्या शासन निर्णयानुसार विभागातील आहरण व संवितरण अधिकाऱ्यांच्या याद्या प्रसिध्द करण्यात आल्या आहेत.

त्या अनुषंगाने प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास), नागपूर यांनी त्यांच्या संदर्भ क्र.२ येथील पत्रान्वये प्रशासकीय अधिकारी, अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (कार्य आयोजना), पूर्व नागपूर यांचे ऐवजी मुख्य वनसंरक्षक (कार्य आयोजना), पूर्व नागपूर यांना त्यांच्या अधिनस्त अधिकारी/कर्मचारी यांची वेतन, व भत्त्याची देयके पारीत करण्यासाठी तसेच इतर क्षेत्रीय कामकाजाकरीता आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्याबाबतचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे. त्याअनुषंगाने मुख्य वनसंरक्षक (कार्य आयोजना), पूर्व नागपूर या पदनामास "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून घोषित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास), नागपूर यांनी त्यांच्या संदर्भ क्र.२ येथील पत्रान्वये सादर केलेल्या प्रस्तावास अनुसरुन पुढील पदास वित्त विभागाच्या दि.०४.०१.२००६ रोजीच्या शासन निर्णयानूसार त्यांच्या अधिपत्याखालील क्षेत्रिय कर्मचाऱ्यांचे वेतन व भत्याची देयके पारीत करण्यासाठी तसेच इतर क्षेत्रीय कामकाजाकरीता आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे :-

| अ. क्र. | वनवृत्त कार्यालयाचे नाव | आहरण व संवितरण अधिकारी घोषित करावयाचे पदनाम | मुख्यालय ठिकाण | जवळचे उपकोषागार कार्यालय व सांकेतांक क्र. |
|---|---|---|---|---|
| १ | मुख्य वनसंरक्षक (कार्य आयोजना), पूर्व नागपूर | मुख्य वनसंरक्षक (कार्य आयोजना), पूर्व नागपूर | नागपूर | कोषागार अधिकारी नागपूर सांकेतांक क्र.४६०१००१०९७ |

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौ. स. क्र.१/२०२२/कोशाप्रशा-५ दि.०४.०१.२०२२ नुसार वित्त विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२२०१२११३१५५१७३१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUNIL PANDURANG PANDHARE

Digitally signed by SUNIL PANDURANG PANDHARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=7f874792415b92ba519384cacb41b53a89cf93dbd96d4be1f7d97fb6326eed47,
pseudonym=E356063E1710100620E953749C8FA6F85E9A154E,
serialNumber=8B7DC58E83C9774E4419A7AEEAC77EAE7CDEA272D759DFB29451BCFE7E3F04C9, cn=SUNIL PANDURANG PANDHARE
Date: 2022.01.21 13:16:06 +05'30'

**( सुनिल पांढरे )**
**उप सचिव (वने)**
**महसूल व वन विभाग**

**प्रति -**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास), नागपूर.
३. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव),महाराष्ट्र राज्य, नागपूर
४. प्रधान मुख्य वनसंरक्षक (कार्य आयोजना),महाराष्ट्र राज्य, नागपूर
५. वनसंरक्षक (कार्य आयोजना), पूर्व नागपूर.
६. महालेखापाल (लेखा परीक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य-१/२, मुंबई/ नागपूर.
   (यांना विनंती करण्यात येते कि, महाराष्ट्र कोषागार नियम १९६८ खंड-१ मधील नियम १५ (२) व १५ (३) नुसार उपरोक्त अधिकाऱ्यास प्राधिकृत करण्याची पुढील कार्यवाही करण्यात करावी.)
७. संचालक, लेखा व कोषागार, संचालनालय, मुंबई.
८. वरीष्ठ लेखा कोषागार अधिकारी, नागपूर / मुंबई.
९. सहसंचालक, (तांत्रिक) लेखा व कोषागार, मुंबई.
१०. वित्त विभाग, कार्यासन कोषा. प्र-५, मंत्रालय, मुंबई.
११. निवड नस्ती (फ-२), महसूल व वन विभाग.